श्री.सुरेश नारायण देशपांडे तत्का. सहाय्यक वनसंरक्षक (वन्यजीव) राधानगरी यांचा निलंबन कालावधी नियमित करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एमएफएस-२०१८/प्र.क्र.४७/फ-८**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ११ जून, २०१८

**वाचा** :- १) शासन आदेश, महसूल व वन विभाग क्र. एमएफएस-२०१६/प्र.क्र.६५/फ-८ दि. २/७/२०१६.
२) शासन ज्ञापन महसूल व वन विभाग क्र.एमएफएस-२०१६/प्र.क्र.६५/फ-८ दि. २६/०७/२०१६.
३) शासन आदेश महसूल व वन क्र.एफएफएस २०१६/प्र.क्र.६५/फ-८ दि.३०/०१/२०१७.
४) शासन ज्ञापन महसूल व वन शासन क्र. चौकशी-२०१७/प्र.क्र.११६/फ-१२, दि. २८/३/२०१८
५) प्रधान मुख्य वन संरक्षक (कार्मिक) नागपूर यांचे पत्र क्र.विचौ/देशपांडे सू.ना./प्र.क्र.१२४/ कक्ष- ९/ ३१८/१८-१९ दि.२७/०४/२०१८.

**प्रस्तावना:-**

श्री.सुरेश नारायण देशपांडे हे सहाय्यक वनसंरक्षक (वन्यजीव) राधानगरी या पदावर दि.१/०८/२०१५ ते ७/०४/२०१६ या कालावधीत कार्यरत असताना, अनियमिततेच्या अनुषंगाने शासन आदेश क्र. एमएफएस-२०१६/प्र.क्र.६५/फ-८ दि.२/७/२०१६ अनुसार ते दि.११/७/२०१६ पासून निलंबित झाले होते. यानुषंगाने श्री.सुरेश नारायण देशपांडे यांच्यावर शासन ज्ञापन एमएफएस-२०१६/प्र.क्र.६५/फ-८ दि. २६/०७/२०१६ अन्वये महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम १९८१ च्या नियम ८ अंतर्गत दोषारोप पत्र बजावण्यात आले होते.

२. शासन आदेश क्र.एफएफएस २०१६/प्र.क्र.६५/फ-८ दि.३०/०१/२०१७ अन्वये श्री.सुरेश नारायण देशपांडे यांचे निलंबन संपुष्टात आणून त्यांची पदस्थापना सहयोगी प्रध्यापक (अभियांत्रिकी) कुंडल विकास प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल या पदावर करण्यात आली. सदरहू पदावर ते दि.६/०२/२०१७ रोजी मध्यान्हपुर्व रूजू झाले.

३. शासन ज्ञापन महसूल व वन विभाग क्र. चौकशी-२०१७/प्र.क्र.११६/फ-१२, दि. २८/३/२०१८ अन्वये श्री.देशपांडे यांच्या विरुध्द बजावलेले दोषारोप पत्र मागे घेण्यास शासनाची मान्यता प्राप्त झाली असून या प्रकरणी भविष्यकाळात अशा प्रकारची पुनर्रावृत्ती होऊ नये म्हणून ताकीद देण्यात आलेली आहे. सबब महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी,स्वीयेतर सेवा आणि निलंबन बडतर्फी आणि सेवेतून काढुन टाकणे यांच्या काळातील प्रदाने ) नियम १९८१ च्या नियम ७२ (३) व (४) मधील तरतुदीनुसार श्री.सुरेश नारायण देशपांडे यांचा दि.१२/७/२०१६ ते ५/२/२०१७ हा निलंबन कालावधी सर्व प्रयोजनार्थ कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करण्याची तसेच या कालावधीचे वेतन व भत्ते अदा करण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

श्री.सुरेश नारायण देशपांडे, तत्कालीन सहाय्यक वनसंरक्षक (वन्यजीव) राधानगरी यांचा निलंबन कालावधी सर्व प्रयोजनार्थ कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करण्याच्या अनुषंगाने खालील प्रमाणे मान्यता देण्यात येत आहेत.

अ) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी,स्वीयेतर सेवा आणि निलंबन बडतर्फी आणि सेवेतून काढुन टाकणे यांच्या काळातील प्रदाने ) नियम १९८१ च्या नियम ७२ (४) मधील तरतुदीनुसार श्री.सुरेश नारायण देशपांडे यांचा दि.१२/७/२०१६ ते दि.५/२/२०१७ निलंबन कालावधी सर्व प्रयोजनार्थ कर्तव्य कालावधी म्हणून नियमित करण्यात येत आहे.

ब) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी,स्वीयेतर सेवा आणि निलंबन बडतर्फी आणि सेवेतून काढुन टाकणे यांच्या काळातील प्रदाने ) नियम १९८१ च्या नियम ७२ (३) मधील तरतुदीनुसार श्री.सुरेश नारायण देशपांडे यांना उपरोक्त कालावधीचे वेतन व भत्ते अदा करताना निर्वाह भत्त्यापोटी अदा करण्यात आलेली रक्कम त्यातून समायोजित करण्यात यावी.

सदरचे आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक सेनिवे-१००१/१३०/सेवा-४ दि.२ जून २००३ सोबतच्या परिशिष्ट -१ मधील क्र.क्र.८ नुसार प्रत्यायोजित करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१११२२०४९१४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Ashok Kode

Digitally signed by Atul Ashok Kode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a12403ed93b05957cb29b7e95265d3ac52d366233b80405514f23a879132aeec, serialNumber=f0d5ee4c99cc9cbfa8761b3ddc7bd6650bad33302f33a35400ad5aad2291371a, cn=Atul Ashok Kode
Date: 2018.06.11 12:22:41 +05'30'

**(अतूल कोदे)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग.

**प्रति,**

श्री.सुरेश नारायण देशपांडे ,
तत्का. सहाय्यक वनसंरक्षक (वन्यजीव) राधानगरी जि.कोल्हापूर
(प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेमार्फत)

**प्रत माहितीसाठी सादर**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
४) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर.
५) महासंचालक,कुंडल विकास प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने) कुंडल जि.सांगली.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
६) निवड नस्ती, फ-८ कार्यासन, महसूल व वन विभाग.